**अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१६-२०१७**
**स्मार्ट ग्राम योजनेंतर्गत वितरीत करावयाचा निधी .**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** स्माग्रायो-२०१६/प्र.क्र.१८५/योजना-१
बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई - ४०० ००१
दिनांक : ३० मार्च, २०१७

वाचा- शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो २०१६/प्र.क्र.१५३/योजना-१ दि.२१ नोव्हेंबर, २०१६

**प्रस्तावना :**

राज्यातील गावांचा शाश्वत विकास घडवून आणण्याकरीता पर्यावरणाचे संवर्धन, जतन व संरक्षण करुन समृध्द व संपन्न गावांची निर्मिती करण्याच्या दृष्टीने राज्यात सन २०१०-२०११ पासून पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजना राबविण्यात येत होती. सदर योजनेचे रूपांतर करून स्मार्ट ग्राम योजना राबविण्याच्या निर्णयास दि.८.११.२०१६ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने दि.२१.११.२०१६ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

सदर योजनेत राज्यातील प्रत्येक तालुक्यातून १ व प्रत्येक जिल्ह्यांतून १ ग्रामपंचायतींची अनुक्रमे तालुका स्मार्ट ग्राम व जिल्हा स्मार्ट ग्राम म्हणून निवड करावयाची आहे. याअनुषंगाने क्षेत्रीय स्तरावर कार्यवाही सुरू आहे. सदर योजनेसाठी उपलब्ध झालेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासननिर्णय:**

स्मार्ट ग्राम योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात रू.२ कोटी इतकी रक्कम पुरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेली आहे. वित्त विभागाने शासन परिपत्रक दि.८.२.२०१७ अन्वये एकूण वार्षिक तरतूदीच्या ८०% च्या मर्यादेत निधी वितरण करण्यास मान्यता दिली आहे. या अनुषंगाने सुधारित अंदाजानुसार स्मार्ट ग्राम योजनेसाठी रू.१.६० कोटी (रूपये एक कोटी साठ लाख मात्र ) इतकी रक्कम अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आली आहे.

२. सदर निधी मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,ठाणे यांना वितरीत कण्यात येत आहे. या निधीबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,ठाणे हे नियंत्रक राहतील.सदरहू निधी मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद ठाणे यांनी पुढील आदेश होईपर्यंत त्यांच्या नियंत्रणाखाली ठेवावा.

नियंत्रण अधिकाऱ्यांनी या योजनेकरिता झालेल्या/होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घेवून प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयात झालेला खर्च यामध्ये तफावत राहणार नाही,याबाबत दक्षता घ्यावी. सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) महालेखापाल कार्यालयास सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी.

३. या शासन निर्णयाद्वारे सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेली रक्कम "२५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८ - ग्रामपंचायतींना सहाय्य, (००) (०१) पर्यावरण संतुलित समृदध ग्राम योजनेच्या अमंलबजावणीसाठी पंचायत राज संस्थाना अनुदान (२५१५ १६७७) (योजनातंर्गत / दत्तमत्त) ३१ - सहाय्यक अनुदान (मागणी क्रमांक - एल ३) (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७८/२०१७/व्यय-१५, दि.२९.३.२०१७ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१०२८०९७३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Gopal Mane
Date: 2017.03.30 12:00:37 +05'30'

**डॉ.वसंत माने**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई ४०० ००१

२ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२,नागपूर

३ अधिदान व लेखा अधिकारी,महाराष्ट्र राज्य (अराप/रालेवि-१), मुंबई
४ सर्व विभागीय आयुक्त
५ मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,ठाणे
६ जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे
७ मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद,ठाणे
८ सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
९ वित्त विभाग (व्यय-१५),मंत्रालय, मुंबई-३२.
१० कार्यासन अधिकारी (वित्त -१) ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
११ निवड नस्ती (योजना-१)